**मा. मुख्यमंत्री / उपमुख्यमंत्री / मंत्री / राज्यमंत्री यांच्या मंत्रालयामधील दालने व शासकीय निवासस्थानी आवश्यक दुरध्वनीसंच खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिईएल-१०२३/प्र.क्र.८७/२०२३/निवास-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ११ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-** १. सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र. टिईएल १०२३/ प्र.क्र.८७/२०२३/२२, दि.०८.०२.२०२४.
२.सा.प्र.वि.,शासन निर्णय क्र.टिईएल-१०२५/प्र.क्र.०१/निवास-१, दि. ०३.०३.२०२५.

**शासन निर्णय:-**

मा. मुख्यमंत्री/मा. उपमुख्यमंत्री/मा. मंत्री कार्यालयाद्वारे व शासकीय निवासस्थानी येथे आवश्यक नविन दूरध्वनी यंत्रणा तात्काळ उपलब्ध करून देण्याबाबत विभागाला मागणी करण्यात आलेली होती. संदर्भाधीन क्र. ०१ येथील शासन निर्णय अन्वये प्रस्तुत बाबींकरीता वित्तीय मर्यादा रू. १०.०० लक्ष इतकी आहे. सदर दूरध्वनी खरेदी ही वार्षिक मर्यादा रू.१०.०० लक्ष मर्यादेपेक्षा जास्त होती. मा. मुख्यमंत्री/मा. मंत्री कार्यालयाला दूरध्वनी यंत्रणेची तात्काळ आवश्यकता विचारात घेऊन शासनाने वित्त विभागाच्या मान्यतेच्या अधीन राहून दूरध्वनी यंत्रणा खरेदी करण्याच्या प्रस्तावास दिलेल्या मान्यतेनुसार व विहीत कार्यपद्धतीनुसार निविदाप्रक्रियेचा अवलंब करून पुरवठा आदेश संदर्भाधीन क्र. ०२ येथील शासन निर्णयानुसार निर्गमीत करण्यात आला आहे. मा. मुख्यमंत्री/मा. मंत्री यांच्या कार्यालयीन व शासकीय निवासस्थानी आवश्यक दूरध्वनी यंत्रणेची किंमत रू. २९,६९,६७९/- (अक्षरी रुपये एकोणतीस लाख एकोणसत्तर हजार सहाशे एकोणऐंशी फक्त) इतकी असून त्यामधून विभागाकडील उपलब्ध रू. ९३,५२३/- (अक्षरी रुपये त्र्यानऊ हजार, पाचशे तेवीस फक्त ) इतकी रक्कम वजा करून सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. टिईएल १०२३/ प्र.क्र.८७/२०२३/२२, दि.०८.०२.२०२४ मधील अ.क्र.०२ नुसार विहीत केलेल्या वित्तीय मर्यादेपेक्षा रू.२८,७६,१५६/- (अक्षरी रूपये अठ्ठावीस लाख, शहात्तर हजार,एकशे छपन्न फक्त) इतक्या जादा अपेक्षीत खर्चास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव दरम्यानच्या कालावधीत वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्यानुसार वित्त विभागाने आता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी वित्तीय मान्यता दिली आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८२/व्यय-४, दि. २६.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०४१११६५२०४७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEVIDAS SANDUJI BHAGURE

Digitally signed by DEVIDAS SANDUJI BHAGURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0990ae5e49835c85a735703503a82e3cd3cdde019c8ce2fdb9c7765ef1b7c39f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D19FEFD30011466572B4E69158C3099ADDED4CBB59D6833F72ED93F73A564DC, cn=DEVIDAS SANDUJI BHAGURE
Date: 2025.04.11 16:53:03 +05'30'

**(दे.सां.भगुरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १ / २ (मुंबई / नागपूर)
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) अवर सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) निवडनस्ती.